आपल्या ताब्यांत यावें अशी तुझी इच्छा आहे, हें मी जाणतों. पण जोंपर्यंत मला भ्रम झाला नाहीं, तोंपर्यंत कांहीं तुझ्या मनांतील हेतु पूर्ण होणार नाहातें असें तूं खात्रीनें समज.

रंगी—आपण जर असंच ह्मणत आहां आणि माझा अंगिकार न करतां मला आणखी कांहीं दिवस वियोगाग्नींत जळत राहण्यासारखं भाषण करीत आहां, तर माझ्यानं कांहीं आतां हें वियोगदुःख सोसवत नाहीं. आपणांवरच माझा भाव आहे. आपणांशिवाय जगांतील पुरुष मी बापाभावा प्रमाणं मानतें,हें सत्य करून दाखविण्यासाठीं आपण आज माझा तिरस्कार करून निघालांत कीं, आपल्या पायांजवळ प्राण द्यावा असा मींही आपल्या मनांत निश्चय केला आहे. हेंही खरं वाटत नसेल तर प्रत्यक्ष अनुभव पहावा. पण मग हातांतून गेल्या प्रमाणं होईल व मनाला दुःख होईल, हें जाणून पहिल्यानं सावध करतें.

पद्माकर—तूं जर काया वाचा मनेंकरून माझ्यावरच भाव ठेवला आहेस, तर खरा प्रकार काय आहे तो स्पष्ट सांगत कां नाहींस?

रंगी—आपण कधीं काय विचारलं आणि मी कोणता

खोटा प्रकार सांगून आपणांस फसविलं ?

पद्माकर—तुझा बाप प्रत्यक्ष रामोशी, माझा प्राण घेण्यासाठीं हें ढोंग माजवून तुह्मीं आलां आहां, हा खरा प्रकार असतां तूं मला आपला नवरा ह्मणतेस, हा खोटसाळपणा नव्हे ? हेंच फसविणें. एकवेळ तुझ्या तावडींत सांपडलों ह्मणजे त्या मन्या रामोशाच्या शिकवणीप्रमाणें तूं वागणारच.

रंगी—तसं तर कधीं होणार नाहीं.

पद्माकर—तसें कधीं होणार नाहीं, असें तूं ह्मणणारच; पण या शुष्क बोलण्यानें माझी खात्री कशी व्हावी?

रंगी—तुमची खात्री होण्यासाठीं मी काय केलं पाहिजे हें आपणच मला सांगावं आणि त्या आज्ञेप्रमाणें वागतें कीं नाहीं हें पहावं.

पद्माकर—असें आहे तर त्या मन्याबानें तुला कसें शिकवून ठेवलं आहे व मी तुझ्या ताब्यांत आलों ह्मणजे काय कर ह्मणून सांगितलें आहे तें पहिल्यानें खरें सांग.

रंगी—आपण माझ्या आधीन झालां, ह्मणजे आपणांजवळ जो नित्य सवा लाख सोनटका प्रसवणारा हिरा आहे, तो मी मागून घ्यावा. नंतर आपणांस कांहीं धुंद करणारा कैफी पदार्थ विड्याबरोबर चारून त्याच्या धुं-

दींत पडला, ह्मणजे त्यांनीं येण्याबद्दलची निशाणी दरवाज्यावर लाऊन ठेवावी. ती त्यांच्या दृष्टीस पडली ह्मणजे ते तिथे येतील व आपणांस ठार मारून आपल्या जातीबद्दलचा सूड उगवितील. हा सगळा खरा विचार आहे. यांत एक अक्षरही मी खोटं सांगितलं नाहीं. आतां जरी मी त्या रामोशांच्याच वराण्यांत लहानाची मोठी झालें आहे, तरी खरोखर त्याची मुलगी नव्हे. माझ्या आईबापाला यांनीं मारलेलं आहे, त्यांच्या बद्दल मलाही सूड घेणें आहे. तो आपण आपल्या मनाप्रमाणं मला आज्ञा करून स्वतः घ्यावा आणि मगच माझा अंगिकार करावा अशी माझी पुनः पुनः सविनय प्रार्थना आहे. अद्याप कोणत्याही प्रकारानं मी भ्रष्ट झालें नाहीं आणि शेवट पर्यंतही भ्रष्ट व्हावं असं इच्छित नाहीं, ह्मणून तर या चरणांचा आश्रय शोधीत आहे. आतां विचार करून काय ती आज्ञा करावी आणि त्या प्रमाणं वागतें कीं नाहीं तें पहावं. विनाकारण दिवसगत लाऊं नये.

पद्माकर—बरें, या वेळेस तुझ्या तैनातीच्या कुळंबिणी शिवाय महालांत कोणी नाहीं?

रंगी—कुळंबिणीशिवाय दुसरं कोणी नाहीं.

**पद्माकर**—जर कोणी नाहीं, तर याच वेळीं मी महालांत येऊन लपून बसतो. तूं त्या रामोशांना खूण करून बोलाव आणि युक्तीनें त्यांच्या हातातलीं हत्यारें काढून घे. ते बिनहत्यारी दहा असामी असले तरी मला त्यांची पर्वा नाहीं. माझी ही तलवार मात्र माझ्या हातांत असावी ह्मणजे झालें.

**रंगी**—ठीक आहे तर. चलावं महालांत आणि तर्यारीनं गुप्त ठिकाणीं बसावं. मी त्याच्या हातांतलीं हत्यारं काढून घेऊन आपण बसलां असाल तेथपर्यंतही सांगाल तर त्यांना कांहीं तरी सांगून पाठवून देण्याचं कबूल करतें. मग तर चिंता नाहीं.

**पद्माकर**—चल तर, मग कांहीं चिंता नाहीं.

**रंगी**—चलावं तर दिवसाचा प्रकाश आहे, तों त्यांना खूण करतें. ह्मणजे मनुष्यास मनुष्य दिसतं न दिसतं इतकी रात्र होय तोंपर्यंत बहुतकरून सगळ्या कर्मांचा शेवट होईल.

**पद्मकार**—फार उत्तम आहे. चलातर. [ जातात. ]

---

## प्रवेश दहावा.

### स्थळ—बागेंतील महाल.

( पद्माकर लपून बसला आहे. रंगी खिडकींत उभी आहे तों तिथे रामोशी येतात. )

**मन्याबा**–शाबास पोरी! कोणत्या ठिकाणीं तो गुंग होऊन पडला आहे? दाखीव. त्याच्या पासून तो हिरा मागून घेतलासनां?

**रंगी**–हिरा मागून घेऊन, तें औषध चारून, त्याचो त्याला गुंगी आल्यावर बरोबर करून एका पासूडींत गाठोड्यासारखी मोट बांधून ठेविली आहे. यासाठीं तुह्मी हीं हातांतलीं हत्यारं इथच ठेवा आणि अजून शहरांतील राजमार्गांत दिवे लागले नाहींत, तों ती मोट गांवाबाहेर नेऊन नदींत टाकून या ह्मणजे झालं.

**हऱ्या**–शाबास रंगाबाई! आज मोठेंच काम केलंस तूं असं ह्मटलं पाहिजे.

**मन्याबा**–मोठं काम करील यांत काय नवल? मुलगी कोणाची आहे? व कोणाच्या तालमींत वाढली आहे? याबद्दल कांहीं विचार केलास?

**रंगी**–तें राहूं दे रे बाबा. सांगितलं त्याप्रमाणं अगोदर

करा आणि निष्काळजी होऊन मग पाहिजे तितका वेळ गोष्टी सांगत व बोलत बसा ठेवा तीं हत्यारं त्या माझ्या पलंगाच्या खालीं आणि चांगले काचे मारून या माझ्या मागून.

**मन्याबा**—( हातांतील तलवार टाकून ) हें बघ हा-तांतलं खळपटणं टाकून दिलं.

**हऱ्या**—तुझी टाकलं तर मला तरी हे ओझं हातांत कशाल पाहिजे? हें मी पण टाकलं पहा. [ हातांतली तलवार पलंगावर टाकून ] चल ताई, दाखीव ती मोट कुठं पडली आहे ती.

**मन्याबा**—हें माझं बी खळपटणं पडूं दे इथं. चल.

**रंगी**—हत्यारं ठेऊन ओझं उचलायाला तयार झालेत या आतां माझ्या मागून हळूच.

**मन्याबा**—त्याचं तूं सगळं बरोबर करून ठेवलं आहे-सना? मग हळूच कां या? अजून कांहीं धास्ती आहे कीं काय?

**रंगी**—धास्ती सारखं कांहीं नाहीं. तरी खोलींत दुसरी अडगळ बरीच आहे; ह्मणून जपून या असं सांगितलं.

**हऱ्या**—[ खोलींत पाय टाकून ] अगबाई, इथेतर अ-गदीं काळोख पडलेला आहे. कांहींचग दिसत नाहीं.

( इतकें बोलत आहे तों पद्माकर त्याजवर वार करून त्याचा शिरच्छेद करतो. )

जन्या—( तो पडल्याचा धपकारा ऐकून ) पडलास कायरे ?

रंगी—होय वाटतं. तूं तरी पुढं हो जनूदादा.

मन्याबा—अग पोरी, दिवा तरी लावायाचा होतास.

जन्या—कशाला हवा दिवा? मी एकटाच त्याची मोट बाहेर ओढून आणतों पहा. ( असें बोलून पुढें होतो, तों पद्माकर त्याच्यावर ही वार करून त्याचा शिरच्छेद करतो व पाडतो. )

रंगी—[ धपकारा ऐकून ] हा काय मेला जुलूम? जो जातो तो पडतो याचा अर्थ काय?

मन्याबा—हीं पोरं अशींच घांद्रीं आणि वेडीविद्रीं आहेत. [ खोलीच्या दारांत येऊन ] हऱ्या, अरे जन्या, कांरे बोलत नाहीं तुह्मी? या खोलींत काळोख इतका आहे कीं, दिव्याशिवाय कांहींच दिसत नाहीं. बये, दिवा घेऊन ये बरें.

पद्माकर—[ वेगानें पुढें येऊन व त्याजवर वार करून ] हा घे दिवा. दिसलें तुला काय आहे तें !

मन्याबा—[ जबरदस्त वार लागल्यामुळें पडून ]

कोणरे हा वार करणारा! त्या थेर्ड्या सावकाराचा कार्टा पद्या काय?

पद्माकर–होय दुष्टा, तोच मी. तुला आतां यमपुरीस पाठवितों पहा. जा आपल्या कर्माचीं फळें भोगण्यासाठीं!

मन्यावा–( पडल्या पडल्या विव्हळ होऊन ) रंगे, पोरीअखेर बेमानी केली आँ! किंवा आपल्या आईबापाबद्दल हा सूड घेतलास? हें जर आधीं कळलें असतें तर या कामांत तुला घेतलें नसतें. असो. आतां काय त्याचें!

पद्माकर–दुष्टा, सूड घेतलास कीं काय हें तिला काय विचारतोस? जशीं कर्मे करावीं तशीं फळें भोगावीं लागतात. हें पहिल्यानेंच तुला कां कळलें नवतें? असो. आतां तरी चांगलें ध्यानांत ठेव आणि नरकवास भोगण्यासाठीं परलोकीं निघून जा. ( असें बोलून त्याचा शिरच्छेद करतो. )

रंगी–( दिवा लावून आणते व आनंदानें पद्माकरास ओंवाळून ) महाराज, प्राणनाथ, आतां तर कांहीं धास्ती व माझ्याविषयीं मनांत संशय राहिला नाहींनां? आतां आनंदानं बाहेर येऊन पलंगावर बसावं, -आणि या दासीचा अंगिकार करावा, इतकीच प्रार्थना आहे. आतां

जर या अनाथ अबलेचा स्वीकार न कराल तर हिच्या-सारखी हतभाग्य बायको जगांत दुसरी सांपडणार नाहीं.

पद्माकर—( बाहेर येऊन व तिला आलिंगन देऊन ) पण प्रिये, तूं दुर्दैवी किंवा हतभाग्य आहेस असें आतां कां ठरेल बरें ? तुझ्यासारखी सद्गुणी व सत्यवचनी स्त्री जगांत आढळणें दुरापास्त आहे. ह्मणून आकाशादि पंच-महाभूतांच्या साक्षीनें मी तुझा अंगिकार, करतों आणि ज्या पृथ्वीमोल हिऱ्यासाठीं इतका प्रकार घडला, तो तुझ्या व माझ्या प्रथम प्रसंगाच्या खुणेकरितां तुझ्या ह-वालीं करून ठेवतों. या हिऱ्याहून तुझ्या गुणाचें मोल अधिक आहे. तर घे हा आपल्याजवळ आणि चांगल्या प्रकारानें जपून ठेव.

रंगी—नको नको. तो हिरा आपणाजवळच राहुंद्या. या दासीवरील प्रीतींत अंतर पडूं देऊं नका ह्मणजे झालं.

पद्माकर—माझी खरोखर प्रीति आतां तुझ्याशिवाय दुसऱ्या स्त्रीवर बसेल असें तूं मनांतही आणूं नको.

रंगी—त्या बद्दल माझ्या जीवाची खात्री आहे. आतां आपण स्नान करावं आणि थोडासा फराळ करून मग त्या पडलेल्या तिन्ही प्रेतांची व्यवस्था लावण्याचा वि-चार करावा.

पद्माकर—त्यांत विचार काय करावयाचा आहे ? बागेंतच रातोरात चांगला खाडा खणावितों आणि तिघांसही एकत्र गाडण्याची व्यवस्था लावतों. तरी पण हा प्रकार करण्याचे आधीं मला घरीं जाऊन त्या दोन्हीं वृद्धांची भेट घेतली पाहिजे. नाहींतर मला अधिक वेळ लागला ह्मणून तीं शोधाशोध करूं लागतील, आणि विनाकारण केलेल्या कर्माचा बभ्रा होईल, तो कांहीं कामाचा नाहीं. स्नान केलें पाहिजे खरें. पण तें मी तिकडे गेल्यावर करीन आणि त्यांच्याबरोबर रात्रीचा फलाहार करून पुढची व्यवस्था लावण्याच्या तयारीनें बरोबर चांगल्या विश्वासाचीं दोन माणसें घेऊन येतों. तूं आपल्याबद्दल आतां मनांत कोणताही दुर्विचार आणूं नको. आतां हा पद्माकर तुला सोडून कधींही राहणार नाहीं, हें चांगल्या खात्रीनें मनांत ठेव आणि आनंदानें सर्व सुखांचा उपभोग घेत रहा ह्मणजे झालें.

रंगी—ठीक आहे. मनांत आहे तर जावें आणि ही दासी या महालांत एकटी आहे, हें ध्यानांत ठेऊन लौकर यावें, हीच माझी वारंवार हात जोडून प्रार्थना आहे.

पद्माकर—ठीक आहे. त्याबद्दलची काळजी सोड. निरुपाय आहे. त्या दोन्हीं ह्मातार्‍यांस मजवांचून चैन

पडणार नाहीं, यासाठीं तिकडे जाणें भाग आहे. नाहीं-तर तुला सोडून जावें असें माझ्या मनाला मुळींच वाटत नाहीं. ( असें बोलून आनंदानें तिला आलिंगन देतो व जातो. )

**रंगी**-( तो गेला असें पाहून ) देवा, आतां प्रीतींत मात्र अंतर पडेल असा प्रसंग आणूं नको; एवढंच तुज-पाशीं मागणं आहे. आजपर्यंत जीं अनेक दुःखं भोगलीं, त्या सर्वांचा क्षय, ही प्रियकराची प्रीति कायम राहिली ह्मणजे झाला असं मी चांगल्या प्रकारानं समजतें. इतके दिवस किंवा इतकीं वर्षं ज्या रामोशाच्या कुटुंबाचा सह-वास होता, त्याचा अशा प्रकारानं अगदीं निकाल ला-गला. आतां एकवेळ त्या मेल्यांच्या नांवानं आंग धुतलं ह्मणजे सुटक फिटलं. खोलीला कुलूप लावून ध्यावं आणि कुळंबिणीला तरी हांक मारावी. ह्मणजे ती पा-ण्याची व्यवस्था करून देईल. ( असें बोलून व मागें पाहून ) सखू, अग सखू? अंमळ इकडे ये बरं.

**कुळंबीण**--( प्रवेश करून ) बाईसाब, का हुकूम है? आज धाकल धनी महालामंदी येऊनशानी वाढोक ब-सल व्हत, ह्मणूनच तुमच्या म्होऱ्यावरली कळी उमाल-लीया जणूं.

रंगी—तें कांहीं असो. त्याबद्दल तुला चौकशी नको. अग मला अत्तांच्या अत्तां आंग धुतलं पाहिजे, यासाठीं जा आणि पाण्याची व्यवस्था करून मला आंग धुवायाला हाक मार. त्याचप्रमाणं स्वयंपाकीणबाईला मजकडे पाठवून दे.

कुळंबीण—जी. पन बया, धन्याची भ्याट झाली न झाली इकत्यांत आंग धुवायाव मजी का है ?

रंगी—मेली चावटच आहे. सांगितलेलं काम करायाचं सोडून भलतंच विचारीत बसेल.

कुळंबीण—राग नग कराया. ही निघाल्यें पघा.(जाते.)

रंगी—स्वयंपाकीणबाई येण्याची वाट पहात न बसतां आपणच स्वयंपाक घरांत जावं आणि रात्रीची सर्व व्यवस्था करून ठेवावी. त्यांचं मन जर शुद्ध झालं आहे, तर आतां कांहीं स्वारी फार वेळ तिकडे राहील असं वाटत नाहीं. ज्या हिऱ्यासाठीं इतके प्रयास भोगावे लागले, तो ज्यापेक्षां माझ्या हवालीं करण्यासाठीं पुढं करण्यांत आला; त्यापेक्षां माझ्या संबंधानं मन चांगलंच शुद्ध झालं आहे, यांत अगदीं संशय उरला नाहीं. आतां मीही अशाच शुद्ध विचारानं वागून लाभलेलं सुख अक्षय राखण्याचा प्रयत्न करीन आणि जगांत

धन्य ह्मणवून घेऊन सुखांत राहीन. चला तर आतां.

( असें बोलून निघून जाते. )

[ रत्नरक्षण प्रहसन—प्रथमांक समाप्त. ]

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ—विजयानगरांतील सावकाराचें घर.**

( पद्माकराचा वृद्ध पिता रघुनाथदास व माता हीं दोघें येतात. )

रघुनाथदास—( आपल्या स्त्रीस ) अग, ऐकतेस का? आपल्या घरावर धाड घालणाऱ्या रामोशांचा अगदीं कुलक्षय झाला. तरी तो कोणी केला असावा? हें समजावें ह्मणून या विजयानगरींतील महाराज बारकाईनें पुष्कळ शोध करीत होते; पण त्यांना कांहीं त्या बद्दल शोध लागला नाहीं. आपल्या बाळानें त्याबद्दल साधारण सुगावा लिहिला होता. त्यामुळें खरा प्रकार आपल्या ध्यानांत आहे. महाराजांस आपला तो बिनमोल हिरा हस्तगत करून घेण्याचा हव्यास अतिशय

लागलेला होता, पण काल अशी बातमी आली आहे कीं, महाराज शिकार करीत असतां एका वाघाच्या पंजाखालीं सांपडले आणि ठार झाले.

**जानकीबाई**—तसं झालं असलं तर फार चांगलं. आपल्या बाळाला घरीं ये ह्मणून कागद धाडायाला तरी मोकळीक झाली.

**रघुनाथदास**—असें जरी मनांत असलें तरी प्रसिद्ध-पणें कोणी ऐकेल असें बोलूं नको. व्याह्यांकडून सुनेला नेण्याबद्दल वारंवार पत्रें येत आहेतच, तेव्हां त्याला इकडे निघून ये, आतां कांहीं धास्ती उरली नाहीं, असें पत्र लिहून पाठविणें भागच आहे. तो आल्याशिवाय सुनेला आणून काय करायाचें आहे? आपण तिला आ-णण्यासाठीं माणसें न पाठवितां व्याह्यांनीच जर तिला आणून पोंचती केली, तर मात्र बाळगणें भाग आहे. तरी हा प्रकार होण्याचें आधीं मुलगा घरीं यावा, अशी इच्छा आहे.

**जानकीबाई**—असं आहे तर त्याला वेळींच पत्र तरी धाडावं.

**रघुनाथदास**—त्याच विचारांत मी आहें. तिकडे पाठविण्यासाठीं आधीं मनुष्य तयार करतों आणि मग

पत्र लिहिण्याचा विचार. नुस्तें पत्र लिहून तरी काय कामाचें ?

जानकीबाई—खरंच तें. पल्ला लांबचा आहे, तेव्हां ज्याला धाडायाचं त्याच्या विषयीं तरी चांगलाच विचार केला पाहिजे. नाहीं तर त्या देशीं जाणारे पाहून आज-पर्यंत थोडीं दां पत्रें गेलीं.

रघुनाथदास—अगत्यानें त्याच्यापर्यंत जाऊन त्याच्या हातीं पत्र देईल आणि स्वतः बारिक रीतीनें त्याजविषयीं चौकशी करून येईल, असा एक आपल्या उपाध्यायाचा मुलगा माझ्या ध्यानांत येतो. तो त्याचा मित्रही आहे, तेव्हां काळजीनें काम करील यांत संशय नाहीं. यासाठीं तो जें मागेल तें देण्याचें कबूल करावें आणि त्याच्या खर्चावेंचाची व्यवस्था करून तिकडे त्याला पाठवावें असें माझ्या विचारास येतें.

जानकीबाई—मग नको कोण ह्मणतं. आज जर पोरगी ( सून ) येऊन उभी राहिली, तर गळ्याला फांस लाऊन घेण्याची वेळ येईल; याचा विचार मनांत राखून काय तो विचार लौकर करावा. लोक हंसूं लागल्यावर धांवाधांव करण्यांत अर्थ नाहीं.

रघुनाथदास—जातों तर मी आणि त्यालाच पाठवि-

ण्याची व्यवस्था करतों. काल कांहीं व्यापारी लोक तिकडून आले, त्यांच्या सांगण्यावरून कांहीं चमत्कार वाटतो. त्याची ह्मणे लग्नाची बायको तेथें आहे, आणि ती महाचतुर असून तो तिच्या अर्ध्या वचनांत आहे. तरी बाह्यात्कारीं लौकिकांत कांहीं कमतरता नाहीं.

जानकीबाई—लग्नाची ह्मणतात एवढंच आश्चर्य, नाहींतर तारुण्य आणि अपरिमित द्रव्य मिळत असल्यावर बायका असंख्यात मिळावयाच्या, हें ठरलेंच आहे.

रघुनाथदास—पण " माझा मुलगा बिघडणार नाहीं आणि सहसा फसणारही नाहीं, " अशी जी माझी खात्री, तिला कात्री लागली; याची वाट काय ?

जानकीबाई—त्याला आपल्याजवळ बोलावून आणावं; हीच त्याची वाट; हें काय मी सांगितलं पाहिजे ?

रघुनाथदास—ह्मणूनच जातों आणि व्यवस्था करतों. तूंही कांहीं काम असलें तर जा, अथवा बैस. ( उठतो. )

जानकीबाई—रात्रीं घरीं लवकर यायचं. पुराण मग जाऊन ऐकलं तरी विशेष पाप होतं असं नाहीं. चाकरमाणसांना तिष्टत बसविणं हेंच पातकाची बाजू धरील.

रघुनाथदास—असें आहे तर लौकर येऊं ? जातों

आतां. मला त्यांवाचून दुसरं कांहीं सुचतच नाहीं. (जातो)

**जानकीबाई**—आपणही जाऊन स्वयंपाकिणीला रात्रीची व्यवस्था सांगावी. तोंपर्यंत पुराणिकबावा येतील.(जाते.)

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ—रंगीचा बागेंतील महाल.**

[ हातांत पत्र घेऊन वाचीत वाचीत रंगी येते. ]

**रंगी**—" माझं अजून लग्नच झालं नाहीं " असं सांगायाचं, आणि या पत्रांत हें काय लिहिलं आहे ? असं नाहीं. आतां स्वारी आली ह्मणजे या बद्दलचा विचार केला पाहिजे. तिकडे ती बिचारी यांच्या नावानं तळमळत राहिली, तर इकडे कोणत्याही कामांत यश येणार नाहीं. या पत्रावरून तर असा प्रकार आहे खचित. तसं केलं तर कांहीं दिवस आपल्याला वियोगांत रहावं लागेल. तरी कांहीं चिंता नाहीं. आपल्यासाठीं, किंवा आपल्या संबंधामुळं कोणी दुःख भोगीत राहील तर तें हितावह होणार नाहीं. बरं, पण अजून स्वारी कां बरं येत नाहीं.

**पद्माकर**—( प्रवेश करून ) आज स्वारी कांहीं मोठा

विचार करीत बसली आहे. हातांत पत्रही आहे वाटतें. [ पुढें येतो. ]

रंगी–( पद्माकरास पहातांच पत्र पोटकळीस ठेऊन व उठून ) यावं, पलंगावरच बसलं तरी कांहीं दोष नाहीं लागणार ?

पद्माकर–दोष कसला ? त्यांत तर उलट अधिक संतोष ! [ आनंदितमुद्रेनें पलंगावर बसून ] या; आह्मीं मात्र पलंगावर बसावें आणि आमच्या प्रियपात्रांनीं उभें रहावें; हें नाहींबा आपल्याला कधीं आवडणार ?

रंगी–ज्यानं त्यानं आपापल्या धर्माप्रमाणं वागावं, त्यांतच कल्याण आहे. बरं, क्षणभर उभी राहिलें, तरी त्यांत कांहीं बिघडत नाहीं. आतां दुसरा प्रकार असा:– " तुजपाशीं कोणतीही खोटी गोष्ट कधीं सांगितली नाहीं आणि पुढंही कधीं सांगणार नाहीं, हें बोलणं अंशतः तरी मिथ्या आहे, असं ठरलं तर कोणाला झालं तरी कोणी काय दंड करावा ?

पद्माकर–तसें तर बहुधा कधीं होणार नाहीं, असें असतां कदाचित झाल्याचा भास झाला तर त्याला कांहीं तरी योग्य व अनिवार्य कारण असेल.

रंगी–हें उत्तर बहुतकरून सगळ्या पेंचांतून सुटका

करील असं आहे खरं. असो. मागंही कित्येक वेळीं मी विचारलेलं आहे, त्याप्रमाणंच आजही विचारतें कीं, आपण प्रवासास निघण्यापूर्वी आपलं लग्न झालं होतं कीं नाहीं ?

पद्माकर—आजपर्यंत मीही जो तुला योग्य व समजूत पटेल असा जबाब दिला नवता, तो आज देतों; ह्मणजे तूं समजशील. कारण—समजुतदार आहेस! असो. आतां जर लग्नच विचारशील, तर तें कांहीं खरोखर झालेलं नाहीं. मोठ्या थोरल्या समारंभांत अमक्या तमक्याची अमुक तमुक नांवाची मुलगी अमक्या तमक्याच्या अमुक नांवाच्या मुलाची बायको, असें मात्र ठरलेलें आहे. तरी त्याला खरोखरीचें लग्न, ह्मणजे दोन वस्तूंचें ऐक्य होणें, तें झालें असें कसें ह्मणतां व मानतां येईल बरें ? प्रिये, खरोखर आणि मानसिकविचाराप्रमाणें विधियुक्त असें लग्न तुझें व माझें मात्र झालेलें आहे.

रंगी—हें कांहीं कामाचं नाहीं. आपण जर लौकिकाला भिऊन वागणारीं माणसं आहों, तर वडिलांनीं आपल्या विचारानं जें करून किंवा ठरवून ठेवलं असेल, तें शिरसा मान्य केलं पाहिजे. तिकडे विजयानगरांत आपण ज्या मुलीबरोबर लग्नसोहळा न्हालां आहां,

तिला रजोदर्शन झालं आहे. आज वर्षान्‌वर्ष ती बिचारी तळमळत आहे. आपणास त्यांच्याकडून कित्येक पत्रं आलीं, पण आपण कांहीं उत्तर लिहिलं नाहीं. असं काय करावं बरं हें ? ह्मटलं तर खरोखर पूज्य, सन्मान-नीय वडील माणसं तीं, त्यांना दुःख होत असलेलं को-णीही झालं तरी चांगलं ह्मणणार नाहीं. तर उद्यां मुहूर्त पाहून तिकडे जाण्याची तयारी करावी. जावं, लौकिका-प्रमाणं काय मंगलविधि करणं तो करून चार दोन म-हिने रहावं आणि मग युक्तीनं निघून यावं, तर खरा चतुरपणा, नाहीं तर काय ह्मणतातनां—"मी हंसतें लों-कांला नी शेंबूड माझ्या नाकाला !" त्यांतली अवस्था !

पद्माकर—हें काय तुमच्या नांवाचें पत्र आलें ! त्यां-चा हा प्रयत्न मात्र लागू पडण्याचा रंग आहे; कारण—आपणांस आतां आमचा कंटाळा आला असावा, हें मी मोठ्या कष्टानें ह्मणतों.

रंगी—असं कपट जर मनांत येत असेल तर मुळींच जाऊं नये. माझ्यापासून हालूंही नये असं मी ह्मणतें. पण तसं वागाल तर लौकिकाची हानि होईल. तें कांचेचं भांडं एकवेळ नादावलं, ह्मणजे मातीच्या मोलानंहीं कोणी विचारीत नाहींत.

पद्माकर–हें सगळें मला समजतें. पण तिकडे जाण्यांत सुख नाहीं. कांहीं तरी दुःख व अपघातही होईल असें माझी मनोदेवता वारंवार मला सांगत आहे.

रंगी–असं जर आहे, तर त्या मनोदेवतेला वेड लागलं आहे.

पद्मकार–बरें आहे तर, एक दोन दिवसांत बाबासाहेबांची परवानगी घेतों . आणि तिकडे जाऊन येतों. गेलों ह्मणजे सहज चार सहा महिने लागणार. इलाज नाहीं. तोंपर्यंत बाबासाहेब आईसाहेब, यांस विश्रांतिस्थान काय तें हेंच. तर तीं नाखुष होतील असें न करितां सावधपणानें आपला तो हिरा संभाळून रहा ह्मणजे झालें.

रंगी–ज्या हिऱ्यासाठीं आपणास प्रवास करावा लागला, ज्याच्या संबंधानं विजयानगरींतील रामोशांचा कुलक्षय झाला आणि ज्याच्या आशेस्तव अन्यायास प्रवृत्त होणारा राजा वाघाकडून मारला गेला, त्याचप्रमाणं तो हिरा आपणाजवळ होता ह्मणून आपला व माझा हा संबंध जडला; तो हिरा आपणाजवळच असला पाहिजे. आज कित्येक वर्षं तो आमच्या जवळ असल्याकारणानं गजांत लक्ष्मी येऊन आमच्याजवळ स्थीर

झाली आहे. तो हिरा मागें टाकून मुलगा एकटा व रिकामा घरीं आला आहे; असं समजतांच आपले वडील हाय घेतील व कदाचित् प्राणही सोडतील. तर तो आपणाबरोबरच असूं द्यावा. नीट संभाळण्याविषयीं सांगणं नकोच !

पद्माकर—ठीक आहे. चला आतां, भूक लागली आहे.

रंगी—अगबाई ! असं का आहे ? पहिल्यानंच कां नाहीं सांगितलं ? बोलण्यावांचून कांहीं नडलं नव्हतं. असो. चलावं आतां. बाई केव्हांची हात जोडून बसली आहे. [ असं बोलून दोघें निघून जातात. ]

---

## प्रवेश तिसरा.

**स्थळ—विजया नगरांतील पद्माकराची स्त्री लक्ष्मी हिचा रंगमहाल.**

[ पद्माकर आपल्या स्त्रीसह आनंदानें बसला आहे तों पडदा उघडतो. ]

पद्माकर—बरें, जेव्हां तुह्मी आपल्या माहेरीं होतां; तेव्हां कधीं आमची आठवण तरी होत होती का ?

लक्ष्मी—असं कसं विचारणं हें ? आपणावांचून दुस-

च्या कोणाची आठवण करायाची आह्मी ? वारंवार आठवण होत असे. पण इकडचा पाय त्या पोटजळीच्या पाशांतून सुटतच नव्हता, त्याला कोणाचा उपाय होता ?

**पद्माकर**—ती तर तुमच्यावर निःसीम प्रेम करिते आणि तुमच्याकडे पहावें तर तुह्मी विनाकारण तिला शिव्या देतां. पण हा प्रकार कांहीं चांगला नाहीं.

**लक्ष्मी**—तसंही कदाचित् असेल. बरं, पण इतके दिवस प्रवास करून अगदीं अपूर्व, अशी वस्तु आपण कोणती बरं संपादन केली आहे ? आमचा दादा व्यापारासाठीं गेला होता, त्यानं किती तरी अपूर्व वस्तु आणल्या होत्या ?

**पद्माकर**—असें काय ? [ आपल्या जवळचा हिरा तिला दाखवून ] अशी अपूर्व वस्तु तुमच्या भावानें आणली होती ?

**लक्ष्मी**—पाहूं पाहूं ! [ हिरा आपल्या हातांत घेते ] आहाहा ! किती तरी प्रकाशित आहे हा ! हा आजची रात्र मजपाशीं असेनां? मी तरी जवळच आहे निजलेली.

**पद्माकर**—बरें आहे, असूंदे. नीट संभाळ. मला आतां झोंप येत आहे. यासाठीं मी शयन करतों. ( पलंगावर निजतो. )

**लक्ष्मी**—[ पतीला झोंप लागली असें पाहून आपल्याशीं ) आतां रात्रींतल्यारात्रींत या हिऱ्याची आंगठी बांधून आणली, तर मात्र त्यांच्यानं हा मजपाशीं मागवणार नाहीं. काय बरं करावं? शामशेट सोनार आपला आहे. फार दिवसांत त्याची व माझी जरी भेट झालेली नाहीं, तरी या आंगठीच्या निमित्तानं जर गेलें, तर तो मात्र रात्रीतल्यारात्रींत याला आंगठीवर बसवून देईल. ( कांहीं थांबून ) चलावं तर, चटकन जाऊन यावं. [ उठते व चालूं लागते. ] देवा, मी परत येईपर्यंत जागे होतील असं करूं नको. इतकीच माझी प्रार्थना आहे. [ जाते. ]

———

## प्रवेश चवथा.

**स्थळ—शामशेट सोनाराचें दुकान.**

( दुकान बंद करून घेऊन बाहेरच्या आडव्या
फळीवर शामशेट सोनार निजला आहे
तों पडदा उघडतो व लक्ष्मी येते. )

**लक्ष्मी**—हेंच तें शामशेटचें दुकान. ( पाहून ) अग बाई! शामशेट आज बाहेरच्या फळीवरच निजला आहे; हें एक काम झालें. ( त्याच्या जवळ जाऊन ) शामशेट, अहो शामशेट!

शामशेट—( जागृत होऊन व पाहून ) कोण? लक्ष्मी! अरे वाः! आज रात्रीची आमची आठवण झाली आं? नशीब आमचें.

लक्ष्मी—शामशेट, अत्तांच्या अत्तां आपल्या जवळचं सोनं घ्या आणि ( हिरा त्याच्या हातावर ठेऊन ) या हिऱ्याची आंगठी मला करून द्या. पहा कसा आहे तो! आमच्या यजमानानीं प्रवासांतून आणलेला बरंका हा!

शामशेट—बरं आहे. ( त्याच्याकडे पहात असतां आपल्याशीं ) हें पृथ्वीच्या मोलाचें रत्न जें ऐकत होतों, तें आज माझ्या हातीं आलें आहे. आतां जर मी जातीचा सोनार आहें, तर याची बदलाबदल केलीच पाहिजे. नाहींतर आजपर्यंत कसब केलें तें काय कामाचें! सर्व लोक " नजरं गुंजं, हस्तं वालं, " इत्यादि बोलून आमच्या जातीचा उपहास करीत असतात; असें आहे तर आपण तरी कां कमी करावें?

लक्ष्मी—शामशेट, पहातच काय बसलेत? आंगठी करतांनां या हिऱ्याची? उगीच वेळ लाऊं नका. मला घाई आहे.

शामशेट—ठीक आहे. दुकान उघडतों, तुम्ही आंत बसा. मी तावडतोब आंगठी घडून तुमच्या हातांत घालतों.

लक्ष्मी—अमुक करतों, तमुक करतों, असे आशीर्वाद नकोत. काय तें करा लौकर. तिकडे मंदिरांत निजवून नकळत आलें आहें. जागे होतील तर तोंड दाखवायाला जागा नाहीं.

शामशेट—( दुकान उघडतो व पेटींतून आंगठीसाठीं सोनें काढीत असतां हातांतील हिरा बदलतो. नंतर एक सोन्याची लगड काढून तिची आंगठी ठोकतो. नंतर लक्ष्मीस ) घ्या ही आंगठी. पहा कशी छान्दार झाली आहे ती !

लक्ष्मी—( आंगठी बोटांत घालून व पाहून आनंदानें) पण कायहो, पहिल्यासारखा हिरा चमकत नाहीं तो ?

शामशेट—त्याची चमक आंगठीच्या कोंदणांत लोपली. जा आतां आनंदानें घरीं आणि यजमानाला दाखवा.

लक्ष्मी—उगीच कांहीं दाखविणार नाहीं. हिऱ्याबद्दल विचारणंच झालं तर आंगठी दाखवीन आणि मोकळी होईन. जातें बरं, सोन्याचे पैसे किती ते द्यावयाचे सांगा मला; ह्मणजे सवडीनं देईन.

शामशेट—जा तुह्मीं; पैशांबद्दल मी तुह्मांला मुळींच विचारीत नाहीं.

लक्ष्मी—तुमचा मजवर लोभच तसा आहे. ( जाते. )

———————

# प्रवेश पांचवा.

**स्थळ—पद्माकराच्या घरापाठीमागची बाजू.**

[ पद्माकर तोंड धुवीत बसला आहे व लक्ष्मी त्याच्या जवळ पाण्याचा तांब्या घेऊन उभी आहे तों पडदा उघडतो. ]

**पद्माकर**–( तोंड धुवून व बायकोनें दिलेल्या उपवस्त्रानें हात पाय वगैरे पुसून बायकोस ) रात्रीचा तो कोठें आहे बरें ! ( कांहीं थांबून ) कां बोलत कां नाहींस ? सांग, रात्रीचा तो कोठें आहे ? रात्रीचा तो हिरा !

**लक्ष्मी**–( हातांतील आंगठी दाखवून ) हा आहे हा !

**पद्माकर**–[ भलताच हिरा पाहून व कावरा बावरा होऊन ] रात्रीचा तो कोठें आहे ? सांग. ( मोठ्यानें ओरडून ) बोल, रात्रीचा तो कोठें आहे ? रात्रीचा ! रात्रीचा ! रात्रीचा तो कोठें आहे ?

**लक्ष्मी**–असं काय हें वेड्यासारखं ओरडावं ? हा आहे ह्मणून सांगतें नां ? मोकळा कोठें गहाळ होईल ह्मणून मुद्दाम आंगठीवर बसवून घेतला आहे.

**पद्माकर**–( मोठ्यानें आकांत करून ) हा नव्हे तो. रात्रीचा तो, तो रात्रीचा तो कोठें आहे ? रात्रीचा ! रात्रीचा ! रात्रीचा दाखीव, सांग, रात्रीचा तो कोठें आहे ?

( याप्रमाणें आक्रोश करून विचारीत असतां त्यास “ रात्रीचा तो कोठें आहे ? ” याच शब्दांचें वेड लागतें व तो अंगावरील वस्त्रें फाडून टाकतो व डोक्यावर धूळ घालून घेऊन ज्याला त्याला “ रात्रीचा तो कोठें आहे?” हेंच विचारीत सुटतो. कित्येक लोकांसह त्याचा बाप रघुनाथदास व आई जानकीबाई धांवत येतात व त्याचें शांतवन करूं लागतात. ) .

**रघुनाथदास**—अरे बा रात्रीचा तो कोण ? आणि तूं हें ज्याला त्याला काय विचारतोस ? तुला हें कसलें वेड लागलें कांहीं समजत नाहीं. नव्यानवसानें काल आलास नाहीं तों आज तुझा हा असा प्रकार ! यांत आम्हीं समजावें काय ?

**पद्माकर**—( पुनः आपल्या बायकोजवळ जाऊन तिला ) रात्रीचा तो कोठें आहे ? रात्रीचा ग, तो रात्रीचा कोठें आहे ?

**जानकीबाई**—( लक्ष्मीस ) मुली, रात्री॰ यानं तुला काय दिलं होतं बाई ? सगळ्या माणसांना सोडून तुलाच विचारतो यांतलं इंगित तुला ठाऊक असलं पाहिजे. खरं काय असेल तें सांग बाई !

**लक्ष्मी**—मला कांहीं दिलं नाहीं आणि काय विचार

तात तें समजतही नाहीं. मला ठाऊक असतं तर सांगितलं असतं. कांहींच ठाऊक नाहीं तर काय सांगावं ?

**पद्माकर**—रात्रीचा तो कोठें आहे ! ( इत्यादि बोलत मोठ्या वेगानें पळून जातो. )

**जानकीबाई**—अगबाई, त्याला धरून तरी आणावं ! माझ्या पोरावर कोणातरी पोटजळीन करणी केली यांत अगदीं संशय नाहीं. [रघुनाथदासास] ऐकायचंका माझं ? बाळाला धरून आणून खोलींत कोंडून ठेवावा आणि शहरांत कोणी पंचाक्षरी असेल तर त्याचा शोध करून त्याला बरोबर घेऊन यावं. त्याच्या बरोबर उज्जनीहून माणसं आलेलीं आहेत. त्यांच्या बरोबर तिकडे हा असा प्रकार झाला आहे, ह्मणून सांगून पाठवावं; त्यांचीही बाळावर पुत्रवत ममता आहे, कांहीं उपाय सुचला त्यांना तर आयतं काम होईल.

**रघुनाथदास**—ठीक आहे. त्याच्या बरेपणासाठीं आतां मला जें जें सुचेल तें करतों. गुण देणें ईश्वराधीन आहे ! खरा प्रकार काय आहे तो या आमच्या सुनेला माहीत असला पाहिजे. ती सांगत नाहीं, त्याबद्दल कांहीं उपाय नाहीं.

**लक्ष्मी**—आपण काय ह्मणाल तें खरंच ठरेल. पण

ईश्वर साक्ष, मला जर कांहीं ठाऊक असेल तर तोच मला पाहून घेईल. याहून अधिक मी काय सांगावं ?

**जानकीबाई**—कांहीं सांगूं नको बरं बाई! आमचंच दैव फिरलं आहे, त्याला तुझा काय उपाय? चल आतां घरांत. पुरे झालं बाहेर उभं राहणं ! ( रघुनाथदासांस ) मुलग्याला धरून आणायाच नां ?

**रघुनाथदास**—आणलाच पाहिजे. मी जातों. तूंही जा घरांत मुलीला घेऊन. [ सर्व निघून जातात. ]

---

## प्रवेश सहावा.

### स्थळ—रंगीचा बागेंतील महाल.

[ स्त्रीसह भगवानदास व रंगी चिंतातुर होऊन बोलत बसलीं आहेत तों पडदा उघडतो. ]

**भगवानदास**—मुली, तूं चतुर आहेस. तो जो उच्चार करीत आहे व ज्या शब्दाचें त्याला वेड लागलें आहे असें समजतें, त्याचा अर्थ कांहीं तुझ्या ध्यानांत येतोका? बिचारा कोणत्या कुमुहूर्तावर घरांतून बाहेर पडला कांहीं कळत नाहीं !

**रंगी**—ते ज्या शब्दाचा उच्चार करतात ह्मणून कळतं, त्या शब्दाचं बीज खरंच पुसाल तर माझ्या ध्यानांत

येत नाहीं. तरी मनाला असं वाटतं कीं, जर मी स्वतः तिकडं जाईन, तर वेड लागण्याचं कारण शोधून काढीन आणि देव दया करील तर शुद्धीवरही आणायाचा प्रयत्न करून त्यांत यशस्वी होईन.

**भगवानदास**—असें आहे तर तुला पाहिजे तितका ऐवज बरोबर घेऊन जा आणि त्याला उपचार करून बरोबर घेऊन ये.

**रंगी**—आपला गोपाळा गडी व सगुणा कुळंबीण या दोघांना माझ्या बरोबर येण्याचा हुकूम करावा. जसं त्या ठिकाणीं मला कोणी ओळखणारं नाहीं, तसं त्या दोघांसही त्या विजयानगरांत कोणी ओळखणार नाहीं.

**भगवानदास**—मी त्यांना तुझ्याबरोबर जाण्याचा व तूं जसें सांगशील तसें वागण्याचा हुकूम देतों. मग तर झालें? तुला पाहिजे तितका ऐवज तुझ्याजवळ आहेच, आणखी मी पाहिजे तितका देतों. त्या शिवाय कांहीं हुंड्या देऊन ठेवतों, ह्मणजे कांहीं काळजी उरणार नाहीं.

**रंगी**—ठीक आहे. मी निघण्याची तयारी करतें. गोपाळ व सगुणा यांस हुकूम देऊन मजकडे पाठवावं, अगदीं निघण्याची तयारी झाली, ह्मणजे निरोप घेण्यासाठीं येईन.

**भगवानदास**—ठीक आहे. आह्मीं जातों व त्या दो-घांला इकडे पाठवून देतों. तूं आपली सगळी व्यवस्था कर. ( असें बोलून स्त्रीसह निघून जातो. )

**रंगी**—येथून निघतांना जरी हा स्त्रीवेष असला, तरी येथून निघून दहा पांच कोस गेल्यावर वेषांतर करून हिंदुस्थानी पठाण बनलं पाहिजे. सगुणा व गोपाळ हीं दोघही हुशार असून घालावीं, त्या वेषांत शोभण्यासारखीं आहेत. बहुतकरून त्यांचा हिरा कोणी तरी गहाळ केला आहे, आणि त्याचंच वेड त्यांना लागलं आहे. त्या विजयानगरींत जातांच नवीन श्रीमान कोण झाला आहे? याचा शोध करून त्याच्यापासून तो हिरा युक्तीनं काढला पाहिजे. [ सगुणा व गोपाळ हीं येतात, त्यांस पाहून ] आलांत तुह्मीं ? इकडे पहा सगुणाबाई, ( तिच्या कानांत सांगून ) असा प्रकार आहे. रात्रीं चंद्रोदय झाला कीं, गाडी जोडायाची, असा बेत आहे. यासाठीं याच वेळीं घरीं जा आणि बंदोबस्त करून ठेवायाचा असेल तो करून दिवे लागणीच्या आंत इकडे या. गोपाळ, ऐकलंसनां हें ? जा तर आपल्या घरीं आणि उशीर न लावतां इकडे निघून ये.

**गोपाळ व सगुणा**—जी बाईसाहेब, जातों अन् याच पायीं हिंग परतनी येतो पघा !

रंगी—तूं हुशार आहेसरे! तरी ध्यानांत रहावं ह्मणून सांगून ठेवायाचं, दुसरा विचार नाहीं कांहीं. जा आतां, दिवाणखान्यांत बरोबर न्यायाचं सामान बांधून ठेवलं आहे, तेवढं गाडींत भर. सगुणाबाई, बरोबर नेण्यासारखीं वस्त्रं घडी करून घेत आहेत. तीं एकत्र बांधून बैठकीच्या खालीं घालून ठेव. बरोबर एक घोडा आहे, त्यावर गावांतून बाहेर पडतांना बैस, मग पाहिजे तर गाडींत ये.

गोपाळ—ठीक आहे. तुमच्या हुकमापरमानें वागन्यांत मजीकुंडं कदीबी कसुर न् कसर व्हायाची न्हाई.

रंगी—तें मला तूं सांगायाला नकोस. जा आतां.

गोपाळ—जी, हा निघालों पघा. [असें बोलून जातो.]

रंगी—बहुतकरून सगुणा व गोपाळा हीं दोघंही सामान गाडींत भरूं लागलीं. तर आपण वाड्यांत जाऊन मामंजी व सासूबाई यांचा हुकूम घेऊन व पादवंदन करून मार्गस्थ होण्यास तयार होऊन रहावं. केव्हां एकवेळ तें विजयानगर दृष्टीस पडेल आणि स्वारीचा तो मुखेंदु केव्हां पाहीन असं मला झालं आहे. [ असें बोलत बोलत निघून जाते. ]

———

# प्रवेश सातवा.

## स्थळ—विजयानगरांतील धर्मशाळा.

[पठाणाच्या वेषानें रंगी, सगुणा व गोपाळा येतात.]

**रंगी**—गोपाल, यह मुशाफरखाना है. अपना बिस्तरा यह मुशाफरखानेमेंही लगा देना. फेर शहरकी हालहवाल देखनेकेवास्ते जायेंगे.

**गोपाळ**—आपके हुकूमके मुवाफिक बिस्तरा लगाया है. आपकी तब्यत चाहती होगी तो शहरकी अहवाल देखनेकेवास्ते जाना. आप आवोगे तबतक रसोईकीबी तयारी हो रहेगी.

**रंगी**—ऐसा है तो घोडेपर सामान चढाव.

**गोपाळ**—घोडाबी सामान चढाके तय्यार किया है. चलो साहेब.

**रंगी**—गोपाल, वह देख, सामने एक बम्मन आता है, उसे दो चार आना दच्छना देके इस शहरमे हालके नवे मोसममे तालेवान् कौन बना है, इस बातका तालाष तो कर.

**गोपाळ**—बहोत अच्छा साहेब. आप घडीभर बैठ रहेना. [ ब्राह्मणाच्या समोर जाऊन ] दंडवत करतो हो, बामणदेव.

**ब्राह्मण**—कल्याण, कल्याण असो बाबा! मुला, कोठू-नरे आला आहेस तूं या शहरांत ?

**गोपाळ**—आह्मी तिकडून आमचे यजमान हे हकीम-साहेब पठाण जातीचे आहेत, त्यांच्याबरोबर आलों आह्मों. भटजीबावा, तुमच्या या शहरांत आमच्या हकी-मसाहेबांचा कांहीं लग्गा लागेल, किंवा येथून यांना अ-सेंच पुढें जावें लागेल ? हें तरी सांगा. [ असें बोलत असतां जवळची एक पावली काढून ] महाराज, ही आपणास दक्षणा घ्या आणि तुमच्या या शहरांत अली-कडे नवीनच श्रीमंत कोण झालेला आहे ? हें कृपा क-रून सांगा.

**ब्राह्मण**—( दक्षणा घेऊन आनंदानें ) मुला, अली-कडे नवीनच श्रीमान झालेला विचारशील, तर तो बेटा शामशेट सोनार मागल्या महिन्यांत भिकारी असतां या महिना पंध्रा दिवसांत एकदम मरभराटीस आला आहे. रोजची लाखो रुपयांची प्राप्ती असल्याप्रमाणें बेत्याचा खर्च चालू आहे. गावांत नवें पाखरूं आलें कीं, त्याला पहिल्यानें आश्रय शामशेटच्या पिंजऱ्याचा. त्याशिवाय अक्षयींच्या सवाष्णी ठरवून ठेवलेल्या त्या आहेतच. असा कांहीं प्रकार आहे. मग काय बिचाऱ्याची कोणती

रेषा उमटली आहे हें समजत नाहीं. समजलास मुला, तूं प्रश्न केलास त्याचें उत्तर. आतां मी आपल्या भिक्षुकीच्या कामसाठीं निघून जातों.

गोपाळ—मी दंडवत करतों महाराज.

ब्राह्मण—आशीर्वाद ! ( असें बोलून निघून जातो. )

रंगी—गोपाल, चलो बजारमें, एक किरायेकी जगा भरचक बजारके बस्तीमे देखके लेना है, और उस जगोमें अपना बिस्तरा लेजाके लगाना है.

गोपाळ—चलो तो साहेब. सब तय्यारी है.

रंगी—चलो तो बजारमे. [ असें बोलून गोपाळासह निघून जाते. ]

---

## प्रवेश आठवा.

### स्थळ—विजयानगरांतील बाजारमार्ग.

( शामशेट व त्याचे सोबती फिरत येतात. )

शामशेट—( सोबत्यास ) गोविंदशेट, आज एखादें नवें पाखरूं नाहींकां आलेलें ?

गोविंदशेट—पिंजरा जर सुबक तयार आहे, तर पाखरांना कांहीं तोटा नाहीं. बाजारांत आज संध्याकाळींच एक नवीन पाखरूं येऊन राहिल्याची बातमी आहे. पाहिजे तर चला पामपडीं घेण्यासाठीं.

शामशेट—अहो चला तर, पाहिजे तर याचा अर्थ काय ?

गोविंदशेट—चालले आहां तसेच चला, ह्मणजे नवें पाखरूं ज्या माडीवर राहिलें आहे, ती माडी दृष्टीस पडेल.

शामशेट—ठीक आहे. चलाच तर, दाखवा तें पाखरूं.

[ सर्व तसेच कांहीं बोलत व थट्टा मस्करी ]
करीत पुढें जातात. ]

गोविंदशेट—( हातानें माडी दाखवून ) शेटसाहेब, ही पहा आली माडी, आणि तें त्या खिडकींत नवीन पाखरूं बसलें आहे.

शामशेट—( कसबिणीच्या वेषानें बसलेल्या रंगीस पाहून ) वाहवा वाहवा ! पाखरूं तर मोठें मारू आहे बुवा ! गोविंदशेट, चला माडीवर. त्या पाखराची कोणी मावशीबिवशी आहे कीं काय ? चौकशी करा बरें.

गोविंदशेट—तिची एक मावशी आहे असें ऐकतों. वर चला ह्मणजे आपोआप सगळें समजतेंच आहे. [ असें बोलत सर्व माडीवर गेल्यासारखें करतात. नंतर लांबट स्वरानें ] कोण आहे हो घरांत ? अहो यजमान ?

सगुणा—( पुढें येऊन ) कोण आहे बाहेर ?

गोविंदशेट–तुह्मी या शहरांत आलां आहां, तर अशीं दारें लाऊन काय बसतां ? अशानें रोजगार कसा चालेल ?

सगुणा–[ दार उघडून ] कोणी आलेलं नाहीं ह्मणून दार लावलेलं. या आंत आणि बसा या बैठकीवर.

सर्व–[ आपापल्या योग्यतेनुरूप बसल्यावर. ]

शामशेट–खिडकींतून पाहिली ती तुमची मुलगी आहे वाटतें ?

सगुणा–जी–होय. मुलगीच माझी ती. पण तिचा यजमान जो होणारा असेल, त्याला पुष्कळ अटी संभाळाव्या लागतील. त्यांत पहिली अट अशी कीं, यजमानाचा सहवास असला ह्मणजे तिला काळोखांत राहणं खपत नाहीं आणि कोणत्याही दिव्याचा उजेड सोसत नाहीं. केवळ रत्नप्रभेंत राहून विलास करण्याची ज्याची शक्ति असेल, त्यानं तिचं नांव काढावं, नाहींतर कांहीं न बोलतां आल्यासारखं पान खाऊन चालतं व्हावं.

शामशेट–इतकेंचनां कायतें ? तिची तशी अट आहे तर तिला रत्नप्रकाशांत बसवितां येईल.

सगुणा–अशी हिम्मत आहे तर ती तुमचीच आहे. हातांत प्रकाशवंत रत्न घ्या आणि आंत चला. बाकीची

मंडळी पाहिजे तर इथं बसूं द्या किंवा जाऊं द्या.

**शामशेट**—गोविंदशेट, हा काय मासला आहे तो पाहून येतों. तुमचीं निरनिराळीं ठिकाणें नेमलेलीं आहेतच.

**गोविंदशेट**—ठीक आहे. आह्मी जातों तर. ( शामशेटशिवाय सर्व आपापल्या जागीं निघून जातात. )

**शामशेट**—( बदललेला हिरा हातांत घेऊन ) मावशीबाई, हा रत्नप्रकाश केला आहे हा पहा आणि कोणीकडून जावें तो मार्ग दाखवा. ह्मणजे सर्व त्रास संपून जाईल.

**सगुणा**—असे या माझ्या मागून. ( आंत जाऊन रंगीस ) मुली, तुझ्या अटीप्रमाणं तुला शांत रत्नप्रकाशांत बसविणारे यजमान आले आहेत, यांचें आगतस्वागत कर.

**रंगी**—[ पुढें येऊन शामशेटास ] यावं महाराज, बाहेर कां उभं रहावं, आंत नाहींका यायचं ?

**शामशेट**—( मोहित होऊन ) स्वर तर अप्रतिम आहे. चला महाराज, तुह्मी उभ्या राहतां व आमचे पाय दुखूं लागतात; असा कांहीं विलक्षण प्रकार आहे.

**रंगी**—असं आहे तर आंत चलावं. [ दोघें आंत जाऊन बसतात. शामशेट हातांतील हिरा चौरंगावर ठेऊन

मस्करी करूं लागतो. ती सोसत नाहीं असें दाखवून ) महाराज, बायकांच्या जातीला मर्यादा व लज्जा प्राधान्य आहे. प्रथम भीड चेपण्यासाठीं कांहीं सामोपचाराचीं कर्मे करावीं लागतात. त्यास अनुसरून कोणी तरी येणारच येणार असं ग्रहीत मानून मसाल्याचं दूध तयार केलं आहे, तें घ्यावं आणि मजबरोबर एखादा सोंगट्यांचा डाव खेळावा. भीड चेपली, ह्मणजे ही दासी आपलीच आहे. अशी घाई कां?

**शामशेट**—बरें आहे. आणा काय दूध आहे तें.

**रंगी**—आई, तें आंटीव दूध आणून दे बरं.

**सगुणा**—हें आणलं. ( दुधाचा तांब्या व वाट्या आणून रंगीच्या पुढं ठेवते. ) दुसरं काय हवं?

**रंगी**—सोंगट्यांचा पट, पानपूड, तस्त, हें काय रोज सांगायाला हवं? जा लौकर आण.

**सगुणा**—[ तिनें सांगितल्याप्रमाणें सर्व आणून ठेवते.]

**रंगी**—[ दुधाची वाटी भरून शामशेटास ] हें दूध घ्यावं.

**शामशेट**—मी एकटा नाहीं दूध पिणार.

**रंगी**—ही दुसरी वाटी मी आपल्यासाठीं भरली आहे. आपण ती घ्यावी आणि डाव मांडावा.

शायशेट–ठीक आहे. [ दूध पितो व सोंगट्यांचा पट मांडून हातांत फांसे घेऊन वाजवीत बसतो. ]

रंगी–( शामशेट गुंगत चालला असें पाहून ) कां महाराज, खेळायाचेंनां आतां? टाका डाव.

• शामशेट–मला झोंप येते. पहिल्यानें या तक्याजवळच टेंकून निजतों. घटकाभरानें खेळूं. [ असें बोलून तक्याशीं टेंकतो व घोरूं लागतो !

रंगी–( त्यानें ठेवलेला हिरा घेऊन ) हाच माझ्या प्रियकराला वेड लावणारा हिरा. या मेल्यानं कसा उपटला असेल तो असो. आपलं काम झालं. आतां या ठिकाणीं राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. [ बाहेर पाहून ] सगुणाबाई, आंत या बरं. ( सगुणा येते. ) हा पाहिला मेला चोर सोनारडा, यानंच माझ्या प्रियकराला वेड लावलं; याला याच ठिकाणीं पडूं द्या. आपलं बिऱ्हाड काय थोडसं आहे तें आटपा आणि चला परत धर्मशाळेंत. उद्यां त्यांचा शोध करून शुद्धीवर आणायाचा उपाय केला पाहिजे. या मेल्याला पडूंद्या इथंच. उद्यां शुद्धीवर आला ह्मणजे यालाही वेड लागलेलं सर्व लोक पाहतील. तो गोपाळ कुठे आहे? त्याला हांक मारा आणि चला आपल्या ठिकाणीं. उजाडलं नाहीं तों आ-

पल्याला पुरुष बनून बसलं पाहिजे. गोपाळ, अरे गोपाळ!

गोपाळ–[ प्रवेश करून ] झालें काम? चलावं आपण. आह्मी सगळें आटपून आपल्या पाठोपाठ आलोंच समजा.

रंगी–ठीक आहे. मी जातें. कोणतीही वस्तु विसरूं नका! या सोनारड्याला मात्र येथें पडूंद्या. [ असें सांगून जाते. ]

रंगी व गोपाळ–[ बंगल्यांतील बिऱ्हाड गोळा करून जातात. ]

———

## प्रवेश नववा.

**स्थळ—विजयानगरींतील बाजारचा मार्ग.**

[ पद्माकर "रात्रीचा तो कोठें आहे?" हें वाक्य उच्चारीत व वेडेचाळे करीत बाहेर येतो. ]

शामशेट–( अंगावरील गुंगी उतरल्यामुळें सावध होऊन ) मी हा कोठें आहें? आँ! ( स्मरण करून ) रात्रीची ती कोठें आहे? माझा तो अमूल्य हिराही घेऊन गेली तर आतां सर्व सोडून तिचा शोध करणें भाग आहे.

पद्माकर–( शामशेट असलेल्या माडीजवळ येऊन ) रात्रीचा तो कोठें आहे?

**शामशेट**–[ पद्माकराचा शब्द ऐकून त्याच्या प्रमाणेंच वेड लागल्यासारखें करतो आणि "रात्रीची ती कोठें आहे !" असा उच्चार करीत बाहेर येतो. ]

**पद्माकर**–( शामशेट जवळ जाऊन ) रात्रीचा तो कोठें आहे !

**शामशेट**–रात्रीची ती कोठें आहे ? ( याप्रमाणें दोघांस दोन वाक्यांचें वेड लागलेलें पाहतांच सर्व लोक आश्चर्य करतात. पोरें दोघांही वेड्यांच्या पाठीस लागतात व त्यांस रंगी राहिलेल्या मुशाफरखान्याकडे घेऊन येतात.)

**पद्माकर**–रात्रीचा तो कोठें आहे ?

**शामशेट**–अरे रात्रीची ती, ती कोठें आहे ?

**पद्माकर**–अरे अं हं, रात्रीचा तो, तो, तो कोठें आहे?

**रंगी**–[ दोघांचे शब्द ऐकून] गोपाल, देखो वह दिवाने बने हुवे षक्स अपने उतारेके नगीच आये हैं. उनमेंसे जो अपना षक्स है, उसे पकडकर ले आव. दूसरा हरामज्यादा सोनी बडा दगलबाज है, उसे जाने देओ.

**गोपाल**–बहोत अच्छा साहेब. [ जातो व पद्माकरास हातांत धरून रंगीजवळ घेऊन येतो. ] साहेब, लो इसे पकडकर लाया है.

रंगी—बहोत अच्छा ! पहिले इस्के बाल बनवाव और हमाममे लेजाके अच्छी तऱ्हांकी मालीष करके खूप गरम पानीसे उस्कू न्हनाव. पीछे उस्का इलाज करेंगे. जाव, देर मत करो.

गोपाळ—( पद्माकरासह जातो व कांहीं वेळानें त्याला स्नान घालून व चांगलीं वस्त्रें नेसवून रंगीजवळ आणतो. )

रंगी—[ त्यास पाहतांच ] बेटा, उसे पडदेके अंदर ले चलो. हम उस्के बेमारीका दवा लेके आते है.

गोपाल—अच्छा साहेब ( पद्माकरासह आंत जातो.)

रंगी—( धर्मशाळेंतील खोलींत जाऊन स्त्रीवेष घेते आणि पद्माकर बसलेल्या ठिकाणीं बुरखा घेऊन जाऊन उभी राहते. )

पद्मकार—रात्रीचा तो कोठें आहे ?

रंगी—( तोंडावरील बुरखा न काढतां त्यास हिरा दाखवून ) हाचका तो रात्रीचा ? पहा बरं !

पद्माकर—( हिरा पहातांच शुद्धीवर येऊन ) हाच हाच तो. ( तिच्या हातांतून घेण्यास पुढें होतो. ) हाच तो रात्रीचा !

रंगी—खबरदार, आतां याला हात लावाल तर. ही

वस्तु नीट जपण्याचं सोडून गाफिलपणानं आपल्या-पासून दूर केलीत आणि वेड घेऊन बसलांत, हें काय शहाणपण?

**पद्माकर**—( आश्चर्यानें ) अरे हे शब्दही ओळखीचे! प्रिये, मला वेड लागलें असें ऐकतांच धांवत आलीसनां? धन्य! धन्य! खरी कुलांगना ती तूंच. नाहींतर लग्ना-च्या बायकोनें पहिल्या भेटीसच वेड लावलें! आतां माझा विनाकारण अंत न पहातां तोंडावरील बुरखा काढून आपलें मुखारविंद एकदां मला दाखीव आणि कृतार्थ कर.

**रंगी**—( तोंडावरील बुरखा काढून व पद्माकरास आलिंगन देऊन ) प्राणनाथ, काय ही आपली दशा? हा हिरा कोणाच्या हवालीं केला होतात?

**पद्माकर**—तूं जिची कींव केलीस तिच्या. नंतर तिनें काय गफलत केली तें मला ठाऊक नाहीं. दुसऱ्या दिवशीं तो तिच्या जवळ नाहीं असें पाहिलें आणि मनाला भ्रम उत्पन्न झाला. तो आज तुझ्या प्रयत्नानें माहींसा झाला आहे. असो. पण हा कोणाजवळ होता आणि तुझ्या हातीं कसा लागला?

**रंगी**—तें सगळं मी आपणांस मग सांगेन. आतां

आपण स्वस्थ असावं. हा ज्या सोनाराजवळ होता, त्यालाही आपणाप्रमाणेंच वेड लागलं आहे. पण त्याला कांहीं या हिऱ्याचं नाहीं वेड लागलं. त्याला रात्रीचीचं वेड लागलं आहे. त्यालाही बरा करतें आणि आपणाबरोबर घरींच चलतें. आपण आतां आनंदानं बाहेर जाऊन बसावं. मला पुनः वेषांतर केलं पाहिजे.

पद्माकर—ठीक आहे.. कर तुला पाहिजे तें.

( बाहेर येतो. )

रंगी—( पठाणाच्या वेषानें बाहेर येऊन ) गोपाळ, उस दिवाने सोनीकू पकडकर ले आव तो.

गोपाळ—उस्के कोई सगे वहाले उसे अपने घर ले गये है.

रंगी—उस्कू अच्छा होनेकी दरकार नही है ?

गोपाळ—होयगी. लेकिन अबी वो मिलनेका मोका नही.

रंगी—मोका नही तो खैर. जाने देओ. (पुनः आंत जाते व स्त्री वेषानें बाहेर येऊन पद्माकरास ) प्राणनाथ, आतां घरीं चलून वडील मातुःश्रीचं दर्शन घेणार कीं परस्पर तिकडे चलणार ? जसं मनांत असेल तसं सागावं, तें मला कबूल आहे. [ या प्रमाणें बोलत आहेत तों शामशेटास बरोबर घेऊन त्याचा भाऊ येतो. ]

सोनाराचा भाऊ–[ गोपाळाजवळ ] येथें वेड काढणारे पठाण आले आहेत ते कोठें आहेत.

गोपाळ–कां बरें !

भाऊ–आमच्या या भावाचें वेड काढायाचें आहेहो.

रंगी–[ सोनारास पाहतांच आंत जाते व पठाणाच्या वेषानें बाहेर येऊन ] गोपाल, क्या है भाई !

गोपाळ–वह दिवाना सोनी आया है.

रंगी–उस्के भाईकू कहो के तुम अपने घरकू जाव. उस दिवानेकू बांधके जेरबंदके एकसो तडाके मारना. फेर देखा जायगा.

गोपाळ–( वेड्याच्या भावास ) अहो, तुह्मीं आपल्या त्या वेड्या भावाला येथें सोडा आणि आपल्या घरीं जातो बरा झाला ह्मणजे आपल्या पायानींच घरीं येईल.

सो० भाऊ–ठीक आहे. मला काय ? हा मी चाललों.

( जातो. )

गोपाळ–( शामशेटास खांबाजवळ बांधून भरामर फटके मारूं लागतो. )

शामशेट–[ फटका बसतांच] रात्रीची ती कोठें आहे ?

गोपाळ–( फटका मारून ) हीच ती रात्रीची !

शामशेट–( दहा वीस फटके खातांच शुद्धीवर

येऊन ] मला तुह्मीं मारतां काय ह्मणून?

गोपाळ—तुला रात्रीची ती पाहिजेनां?

शामशेट—नको नको. ती अवदसा मला फसवून व माझी एक अमोलिक वस्तु घेऊन गेली. तिचें पुनः मी नांवही घेणार नाहीं.

गोपाळ—नांव घेणार नाहींस तर पुनः असे वेडेचाळे न करितां आपल्या घरीं निघून जा. मूर्खा, परक्याची मौल्यवान् वस्तु जरी गफलतीनें हातीं लागली तरी ती पचत नाहीं, हें तुला पहिल्यानेंच समजलें पाहिजे होतें. असो. आमच्या हकीम साहेबांच्या औषधोपचारानें आज तूं शुद्धीवर आला आहेस. त्याचे उपकार मान आणि घरीं जा. पुनः अविचारानें वागूं नको.

शामशेट—फार चांगलं आहे महाराज! ( जातो. )

रंगी—( स्त्रीवेषानें बाहेर येऊन पद्माकराजवळ बसते)

( इतक्यांत स्त्रीसह रघुनाथदास येतो. )

रघुनाथदास—अरे, माझा पद्माकर एका पठाणानें बरा केला असें सांगतात, तो कोठें आहे?

पद्माकर—प्रिये, आमचे वडील व मातुश्री माझा शोध करीत येत आहेत.

रंगी—फार चांगलं. त्यांना सगळं वर्तमान सांगून त्यांच्या विचारानंच मला घरीं घेऊन चलावं.

पद्माकर—ठीक आहे. [ रघुनाथदासाजवळ जाऊन ] बाबा, मी आतां चांगल्या शुद्धीवर आलों आहें. ( त्याच्या कानांत सांगून ) असा असा सगळा प्रकार आहे. याचा विस्तार घरीं गेल्यावर सावकाशपणानें आपणाजवळ सांगेन.

रघुनाथदास—असं आहे तर सोन्याहून पिवळें झालें असें समजा आणि ईश्वराचे उपकार मानून त्या चतूर व हुशार स्त्रीसह घरीं चला. ती आह्मांला आमच्या जीवाहूनही प्रिय आहे

रंगी—( विनयानें पुढें येऊन दोन्ही वृद्धांस नमस्कार करते. रघुनाथदास व जानकीबाई तिला आशीर्वाद देतात आणि आनंदानें पुत्रासह तिला बरोबर घेऊन आपल्या घरीं जातात. )

[ रत्नरक्षण प्रहसन समाप्त. ]

परोपकारबुद्धीमुळें आणि शाकंबरी राणीच्या कडकडीत पातिव्रत्यामुळें परमेश्वरानें या उभयतांची विलक्षण रीतीनें भेट करून दिली. या कादंबरींत शृंगार, वीर, करुण इत्यादि रसांची कमाल केली आहे. कागद जाड व घोंटिव, छपाई सुरेख पुठ्याचें बाईडींग व पृष्टें २७९ किंमत सवा रुपया.

विठ्ठल संभाजी मूरकर.

---




अथवा

**इंग्लिश लोकांनीं कोणत्या रीतीनें एतद्देशि यांस वागविलें असतां त्यांच्या राज्या-ला अधिक बळकटी येईल ?**

आर्यावर्त सुभूमि स्वर्णमय जी प्रत्यक्ष श्री आणि गी ॥
जेथें वीर अनंत सज्जन गुणी विख्यात झाले जगीं ॥

निकृष्टा अज जाहली वसुमती श्रेष्ठत्व येवो तिला ॥
होवो सरूप ईश इंग्लिशमहाराज्ञी वरो कीर्तिला ॥ १॥

या नाटकरूपी पुस्तकांत इतिहासप्रसिद्ध गोष्टींच्या मुख्य सारांशाचें चित्र लोकांपुढें प्रत्यक्षत्वानें मांडून, एतद्देशियांची राजसत्ता जाण्याला व त्यांना निकृष्टावस्था प्राप्त होण्याला कोणतीं कारणें झालीं हें स्पष्टपणें दाखविलें आहे. आणि आमच्या इंग्रज सरकारानें आह्मां हिंदुस्थानवासी लोकांस चांगल्या रीतीनें वागवून व राजव्यवस्थेसंबंधी पार्लमेंटच्या धर्तीवर विशेष हक्क देऊन त्यांस खुष व अनुकूल ठेवण्याच्या भावी व्यवस्थेबद्दल सुचनाही केली आहे. हें पुस्तक ऑनरेबल काशिनाथ त्रिंबक तेलंग, सी. आय. ई, एम. ए. एल. एल. बी., मुंबई हायकोर्टाचे जज्ज, यांस अर्पण केलें आहे. कागद जाड व घोटीव, छपाई सुरेख, मजबूत बाइन्डींग व पृष्टें १०० किंमत आठ आणे, टपाल खर्च एक आणा.

विठ्ठल संभाजी मूरकर,
दुर्गादेवीची गल्ली, गिरगांव पोस्ट, मुंबई.

